श्री. दिगांबर अंबादास दळवी यांना म.शि.से. गट अ (तां.) या संवर्गातील उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण -नि- उपशिक्षणार्थी सल्लागार (वरिष्ठ) या पदावर सरळसेवेने नियुक्त करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## कौशल्य विकास व उद्योजकता विभाग

**शासन आदेश क्रमांक: व्यशिअ-२०१८/(७१/१८)/व्यशि-१**

मुख्य इमारत, २ रा मजला, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: २० डिसेंबर, २०१९.

**संदर्भ:-** महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे गोपनीय पत्र क्र.१५(१)(६०)/११९३/सात-अ, दिनांक १६ नोव्हेंबर, २०१६.

## आदेश

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (तांत्रिक) या संवर्गातील उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण-नि- उपशिक्षणार्थी सल्लागार (वरिष्ठ) (असुधारित ६वा वेतन आयोग वेतन श्रेणी रु.१५६००-३९१००/- ग्रेड पे रु.६९००/- या वेतनश्रेणीत) या पदावर महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत खालील उमेदवाराची त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी, ते ज्या दिनांकापासून पदाचा कार्यभार स्विकारतील त्या दिनांकापासून २ वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी नामनिर्देशनाद्वारे तात्पुरती नियुक्ती खालीलप्रमाणे करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नाव | नियुक्तीचा प्रवर्ग | नामनिर्देशनाद्वारे करावयाचे नेमणुकीचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. |
| **१.** | **१.** | **श्री. दिगांबर अंबादास दळवी** | **ओपन-१** | **उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण-नि- उपशिक्षणार्थी सल्लागार (वरिष्ठ), मुख्य कार्यालय, मुंबई.** |

२. सदर नियुक्ती खालील अटींच्या अधीन राहील :-

I. श्री.दि.अं.दळवी यांच्याविरुध्द शासन ज्ञापन,क्र.व्यशिअ-२०१३/(६८/१३)/व्यशि-१ दि.९.६.२०१४ व शासन ज्ञापन क्र. व्यशीअ -२०१०/(२६०/१०)/व्यशी-१ दि. ३१.०८.२०१७ अन्वये सुरु करण्यात आलेल्या विभागीय चौकशीसंदंर्भात होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून नियुक्ती देण्यात येत आहे.

II. उपरोक्त उमेदवाराची नियुक्ती सरळ सेवाप्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमाच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची एक वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

III. उपरोक्त उमेदवाराने शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.६१/ २००१/३९, दि.१९/०३/२००३ च्या तरतुदीनुसार संगणक हाताळणे/वापराबाबतचे शासन मान्यताप्राप्त प्रमाणपत्र नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत विभाग प्रमुखाकडे सादर करणे अनिवार्य राहील.

IV. परिविक्षाधीन कालावधीत संबंधित अधिकाऱ्यांने कामाचा दर्जा प्राप्त न केल्यास किंवा विहीत विभागीय परीक्षा काही असल्यास विहीत कालावधीत उत्तीर्ण न केल्यास किंवा त्यांचे काम किंवा वर्तणूक समाधानकारक न आढळल्यास त्यांना कोणतीही पूर्व सूचना न देता सेवेतून कमी करण्यात येईल.

V. उपरोक्त उमेदवाराची महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (तां.) या संवर्गातील ज्येष्ठता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या गुणवत्ताक्रमानुसार आणि विहीत मुदतीत त्यांनी त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकारल्यावर / मुदतवाढीवर अवलंबून राहील.

VI. उपरोक्त उमेदवाराचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम १९८१ मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात यावे.

VII. उपरोक्त उमेदवाराला शासन निर्णय, शालेय शिक्षण व सेवायोजन विभाग क्रमांक:एससीटी ६५६३/ए, दिनांक १८ जानेवारी, १९६३ अन्वये विहीत करण्यात आलेला करारनामा करावा लागेल. याबाबत संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

VIII. वरील उमेदवाराने त्याच्या नावासमोर निर्देशिलेल्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत रुजू व्हावे.

IX. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.:अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि. १८/८/२००९ मधील तरतुदीनुसार दि.१ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तिवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचाऱ्यांचे त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तिवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दिनांक १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक:अंनियो-१००६/८७/सेवा-४ दिनांक १२ जानेवारी, २००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधित शासकीय कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन), नियम- १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. या परिपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचाऱ्यास नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू ठरेल.

३. उपरोक्त उमेदवाराला वर नमूद केलेल्या अटी व शर्तीं व्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्याखालील राज्यसेवा अधिकाऱ्यांना जे सेवाविषयक नियम लागू आहेत ते लागू होतील.

४. उपरोक्त उमेदवाराला नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

५. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी त्यांना संबंधित पदावर रुजू करण्याची कार्यवाही तात्काळ करावी व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा. तसेच या संबंधीची आवश्यक ती अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिध्द करण्यात यावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक: २०१९१२२०१६१५१५४२०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Baban Sheshrao Mandwe

Digitally signed by Baban Sheshrao Mandwe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development and Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d101a905c7fca95ea9a4a68053d53dda9fcd8b54a203c383517611e96421b187, serialNumber=1aa5b45b907b3656679abdeb9469faf1da391d1546ceaae47f19acd496b13685, cn=Baban Sheshrao Mandwe
Date: 2019.12.26 17:24:01 +05'30'

**( ब. शो. मांडवे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) संचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-१.

२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, ५१/२ वा मजला ८ व ७, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई-४०० ०२१. (पत्राद्वारे).

३) मा.मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे खाजगी सचिव.

४) अपर मुख्य सचिव , कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.

५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर. (संचालकांमार्फत).

६) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर. (संचालकांमार्फत).

७) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१. (संचालकांमार्फत).

८) संबंधित अधिकारी (संचालकांमार्फत).

९) निवडनस्ती (व्यशि-१).